**मे. टि सी एस सोबतच्या संयुक्त प्रकल्पासाठी शासनाच्या संचालकांची नेमणूक करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
माहिती तंत्रज्ञान संचालनालय,७वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
मातंसं/नस्ती-०९/प्र.क्र.१०१/का-३९/०२
दिनांक :- १४-६-२०१०.

वाचा :- शासन निर्णय क्रमांक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक डिआयटी/ जेव्ही-टीसीएस फाईल नंबर-२०/३९, दिनांक १६ सप्टेंबर २००८

**प्रस्तावना :**

मंत्रिमंडळाच्या दिनांक ६ ऑगस्ट २००८ रोजीच्या बैठकीत टाटा कन्सल्टंसी सर्व्हिसेस लि. सोबत डी जी गव्हर्नन्स आणि राज्याचे संकेतस्थळासाठी संयुक्त संस्था स्थापण्यासाठीचा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला. यास अनुसरुन शासन निर्णय क्रमांक : डिआयटी/जेव्ही-टीसीएस फाईल नंबर-२०/३९, दिनांक १६ सप्टेंबर २००८ अन्वये संयुक्त संस्थेचे स्वरुप आणि कंपनीच्या कामकाजाची मार्गदर्शके निश्चित करणारा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. मंत्रिमंडळाच्या निर्णयास अनुसरुन संयुक्त प्रकल्पासाठी तयार करण्यात आलेल्या भागधारकांचा करारनामा आणि निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयास उच्चाधिकार समितीच्या दिनांक १४ जानेवारी २०१० रोजी झालेल्या ५३ व्या बैठकीत मान्यता घेण्यात आली. महाराष्ट्र शासनाचे २६% आणि टि सी एस कंपनीचे ७४% या भागभांडवलाच्या स्वरुपासह सदर संयुक्त संस्थेची आखणी १० वर्षासाठी करण्यात आली आहे. या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन आणि प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) यांना महाराष्ट्र शासन आणि मे. टि सी एस यांच्यातील संयुक्त संस्थेसाठी संचालक म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन हे महाराष्ट्र शासन आणि मे. टि.सी.एस. लि. यांच्या संयुक्त संस्थेचे अध्यक्ष असतील. शासनाचे भागभांडवल महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावे असेल व मुख्य सचिव / सचिव, माहिती तंत्रज्ञान हे महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या वतीने कार्यभार पाहतील. मे.

टि.सी.एस. लि.यांच्यासोबत संयुक्त संस्था स्थापनेसाठी आवश्यक असलेल्या सर्व प्रकारच्या दस्तावेजावर स्वाक्षरी, भांडवल गुंतवणूक आणि संयुक्त संस्था स्थापनेसंबंधातील नियम, अटी शर्ती व करार करण्यास मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन हे सक्षम असतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा क्रमांक २०१००८१३१४२०५१२४००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार.

( डॉ. अजय भुषण पांडेय )
**प्रधान सचिव (मा.ते.)**

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
युनीक आयडेंटिटी ऑथॉरिटी ऑफ इंडिया
मेसर्स टाटा कन्सल्टंसी सर्व्हिसेस लि.
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त, /सर्व जिल्हाधिकारी,/ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / लेखाकोष भवन, बांद्रे (पूर्व), मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती (२ प्रती).